वितरण आदेश क्र. ११

**जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, परदेशपुरा, संगमनेर, जिल्हा अहमदनगर या संस्थेच्या अस्तित्वातील इमारतीच्या दुस-या मजल्यावरील बांधकाम करण्याच्या कामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येऊन निधी वितरित करणेबाबत.**
**( सन २०१६-१७ ) योजनांतर्गत ( ४०७० ०२३१ )**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टीआरएन -२०१७/प्र.क्र.३९/१७/१२-अ,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०१७

**संदर्भ :-** १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८०/अर्थसंकल्प,३ दि.१ एप्रिल, २०१६.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१६/प्र.क्र.५२ /२०१६/२५, दि.६ एप्रिल, २०१६
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८९/अर्थसंकल्प,३ दि. २० एप्रिल, २०१६.व दि.८.२.२०१७.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१६/ प्र.क्र.५२ /२०१६/२५, दि .२२ एप्रिल, २०१६
५. प्राचार्य, यांचे क्र जिशिप्रसंसं/स्टेनो /२०१७/१८७ दि.१४.०२.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्य प्रशिक्षण धोरण २०११ नुसार घोषित झालेल्या ६ विभागीय संस्था व ३६ जिल्हा संस्थांमध्ये प्रशिक्षणाकरिता येणा-या प्रशिक्षणार्थी यांच्यासाठी आवश्यक त्या पायाभूत सोई- सुविधा निर्माण करणे गरजेचे आहे. त्याकरिता मागणी क्र.ए-९, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च ( ००) ००३, प्रशिक्षण (००) (०१) राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत नवीन प्रशिक्षण संस्था स्थापन करणे ( ४०७० ०२३१ ) ५३ मोठी बांधकामे, या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये एकूण रु.२०.००कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन परिपत्रकान्वये, वित्तीय वर्ष २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीच्या १०० % च्या मर्यादेत रु.२०.००कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे.

३. **जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, परदेशपुरा, संगमनेर, जिल्हा अहमदनगर या** संस्थेच्या मुख्य प्रशासकीय कार्यालयाच्या इमारतीच्या दुस-या मजल्यावर प्रशिक्षणार्थी यांच्याकरिता निवास व्यवस्थेकरिता रु.४१.६६ लाख इतक्या रक्कमेचे बांधकाम प्रस्तावित आहे. संस्थेच्या या बांधकामाचे प्राथमिक स्वरुपाचे अंदाजपत्रक सहायक अभियंता, सा.बां. उप विभाग, संगमनेर यांनी तयार केलेले व कार्यकारी अभियंता, सा.बा.वि. संगमनेर, जिल्हा अहमदनगर यांनी साक्षांकित केले आहे. संस्थेने संदर्भाधीन क्र.५ च्या पत्रान्वये रु.४१.६६ लाख एवढया रकमेचे अंदाजपत्रक व आराखडा सादर करुन निधीची मागणी केली आहे. त्या अनुषंगाने संस्थेच्या सदर कामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येऊन निधी वितरित करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

**जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, परदेशपुरा, संगमनेर, जिल्हा अहमदनगर या** संस्थेच्या मुख्य प्रशासकीय कार्यालयाच्या इमारतीच्या दुस-या मजल्यावर प्रशिक्षणार्थी यांच्या निवास व्यवस्थेकरिता रु.४१.६६ लाख इतक्या अंदाजपत्रकास तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेसाठीचा प्रस्ताव सा.बां.विभागाकडे सादर करण्यात आला होता.

२. प्रस्तुत कामांचे अंदाजपत्रक मंत्रालयीन सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले असून, छाननी अंती खाली दिलेल्या तक्त्यानुसार एकूण **रु. ४९.२४ लाख** इतकी रक्कम खालील तक्त्यात दिल्याप्रमाणे बाबनिहाय निश्चित केली आहे.

Recapitulation Sheet

| Sr.No. | Essential Sheet | Cost in Rs. | Cost in Rs. |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | Cost of Work Portion | ३७,४९,१४१.०० | ३७,४९,१४१.०० |
| २ | Electrification (११%) | ४,१२,४०६.५१ | ४,१२,४०६.०० |
| | Total Rs. | **४१,६१,५४६.५१** | |
| ३ | ४ % Water supply | ------------- | १,४९,९६५.०० |
| | **Total Rs.** | -------------- | **४३,११,५१२.००** |
| ४ | Add १५% Service Tax on ४० % cost of proper building | ------------- | २,२४,९४८.०० |
| ५ | Add Centage charges ५% | ------------- | २,१५,५७६.०० |
| | **Total Rs** | -------------- | **४७,५२,०३६.००** |
| ६ | Add contrary charges ४% | -------------- | १,७२,४६०.०० |
| | **Total Rs.** | **४१,६१,५४६.५१** | **४९,२४,४९६.००** |
| | **Total (A)+(B) Rs.** | | **४९.२४ lakhs** |

३. सार्वजनिक बांधकाम विभागाने, प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकामध्ये आवश्यक त्या सुधारणा व दुरुस्त्या करुन खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तुत कामासाठी एकूण **रु. ४९.२४ लाख (अक्षरी रुपये एकोणपन्नास लाख, चोवीस हजार फक्त)** इतक्या **रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.**

(अ) सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना उपभोक्त्या विभागामार्फत सा.बां.विभाग शासन निर्णय क्र. बीडीजी २०१४/प्रक्र.९६/इमा.३ दि.८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात आली आहे, असे सा.बां. विभागामार्फत गृहीत धरण्यात येत आहे.

(ब) प्रस्तुत नस्तीसोबतच्या अंदाजपत्रकावर उपभोक्ता विभागाचे सक्षम अधिका-यांची स्वाक्षरी घेणे आवश्यक आहे. त्याचबरोबर वाढीव काम हाती घेताना अस्तित्वातील इमारतींची क्षमता तपासून घ्यावी.

(क) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(ड) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

(इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तांत्रिक कक्ष १, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करावी.

४. त्यानुसार, **जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, परदेशपुरा, संगमनेर, जिल्हा अहमदनगर या** संस्थेच्या मुख्य प्रशासकीय कार्यालयाच्या इमारतीच्या दुस-या मजल्यावर प्रशिक्षणार्थी यांच्या निवास व्यवस्थेकरिता परिच्छेद क्र.२ मधील तक्त्यातील रकाना क्र.४ नुसार निश्चित केलेल्या एकूण **रु. ४९.२४ लाख** ( रुपये एकोणपन्नास लाख, चोवीस हजार फक्त ) एवढया रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने मंजूरी दिलेल्या अटीनुसार तसेच वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्र. ४, परिच्छेद क्र. २७ (२) प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

तसेच, सदर लेखाशिर्षाखाली वित्त विभागाने मंजूर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीच्या अनुषंगाने शिल्लक असलेला निधी **रु. २१.२० लाख ( रुपये एकवीस लाख, वीस हजार फक्त** ) इतक्या निधीस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

५. **जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, परदेशपुरा, संगमनेर, जिल्हा अहमदनगर या** संस्थेंच्या वरील कामांसाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला **रु. २१.२० लाख (रुपये एकवीस लाख, वीस हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.**

६. यासाठी होणारा **रु. २१.२० लाख ( रुपये एकवीस लाख, वीस हजार फक्त** ) इतका खर्च मागणी क्र.ए-९, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च ( ००) ००३, प्रशिक्षण (००) (०१) राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत नवीन प्रशिक्षण संस्था स्थापन करणे ( ४०७० ०२३१ ) ५३ मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. त्याचप्रमाणे, सदर निधी सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर यांना सदर कामाच्या अनुषंगाने त्यांच्या मागणीनुसार वितरित करण्यात यावा.

८. सदरहू मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

९. आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र ( UTILIZATION CERTIFICATE ) **जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, परदेशपुरा, संगमनेर, जिल्हा अहमदनगर**, यांनी महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १, मुंबई यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

१०. उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र-१, मुंबई,यांना राहतील आणि त्याकरीता संबंधित संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११. प्रस्तुत शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग, यांच्या मान्यतेने अनौ.संदर्भ क्र. १५०/१७ इमारती-३, दि.७.३.२०१७, अन्वये तसेच, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ ३, दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच त्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३२१११२९४३५४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2017.03.21 11:40:31 +05'30'

**( अजित सो. देशमुख )**
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. जिल्हाधिकारी, अहमदनगर .
३. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
४. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
५. उप कोषागार अधिकारी, संगमनेर, जिल्हा - अहमदनगर
६. प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, परदेशपूरा, संगमनेर, संगमनेर, जिल्हा अहमदनगर, पिन कोड क्र.४२२६०५
७. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३ ) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२,
८. अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन-इमारती -३ मंत्रालय, मुंबई-३२,
९. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५,
१०. निवड नस्ती.१२-अ.